**वनक्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेत्तर योजनेखाली २० अस्थायी पदांना सन २०२०-२१ या वर्षासाठी मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२०/प्र.क्र.९५/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ३० मार्च, २०२०.

**पहा :-**

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्रमांक एस-१०/२०१९/प्र.क्र.१८७/फ-३, दिनांक ८.०३.२०१९ व दिनांक ९.१०.२०१९.
२) या विभागाचे शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.२०/१९-२०/१७४३; दिनांक १८.०२.२०२०.
४) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.०२.२०२०.

**शासन निर्णय :**

वनक्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेत्तर योजनेखालील २० अस्थायी पदे दिनांक २९.२.२०२० पर्यंत चालू ठेवण्यास शासनाने संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये यापूर्वी मान्यता दिली होती. सदर २० अस्थायी पदांना आता दिनांक २८.२.२०२१ पर्यंत चालू ठेवण्यासाठी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रस्ताव सादर केला आहे.

**२.** वित्त विभागाच्या दिनांक १२.०२.२०२० च्या शासन निर्णयानुसार सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधिनस्त सर्व अस्थायी पदांना दिनांक ३०.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहे. यास्तव **प्रपत्र-अ** मध्ये दर्शविल्यानुसार सदर २० अस्थायी पदे **दिनांक १.०३.२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत** चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) सदर २० अस्थायी पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालवधीसाठी रिक्त नाहीत.
ब) सदर २० अस्थायी पदे वन विभागातील पदांच्या आढाव्याअंती मान्य केलेल्या आकृतीबंधातील २७७९२ पदांमध्ये समाविष्ट असणे आवश्यक आहे.

**३.** या पदावर होणारा खर्च प्रधान शिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), ०१ वनीकरण, १०१ वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती (०१) (०२) वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (२४०६ ०१०२) या लेखाशिर्षा खाली सन २०२०-२१ या वित्तीय वर्षातील मंजूर होणाऱ्या अनूदानातून भागविण्यात यावा.

**४.** हा शासन निर्णय वित्त विभागाचे क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२.०२.२०२० च्या शासन निर्णयास अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३३०१४१२४३९२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sunil Pandurang Pandhare

Digitally signed by Sunil Pandurang Pandhare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f874792415b92ba519384cacb41b53a89cf93dbd96d4be1f7d97fb6326eed47, cn=Sunil Pandurang Pandhare
Date: 2020.03.30 14:15:53 +05'30'

**( सुनिल पांढरे )**
अवर सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. सर्व विभागीय आयुक्त.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक, ठाणे/ पुणे/ नागपूर/औरंगाबाद.
६. वनजमाबंदी अधिकारी, भोर /औरंगाबाद/कोंकण, नागपूर.
७. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. नियोजन विभाग, (योजना-१४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. वित्त विभाग, व्यय-१०, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३. निवडनस्ती, फ-३ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**<u>प्रपत्र-अ</u>**

| अ.क्र. | पदनाम | पद संख्या | पदांचा वृत्तनिहाय तपशील |
|---|---|---|---|
| १ | वनजमाबंदी अधिकारी | ४ | (पुणे-१ /औरंगाबाद-१ / ठाणे-१/ नागपूर-१) |
| २ | वनपाल | १ | (ठाणे-१) |
| ३ | मंडळ अधिकारी | १ | (पुणे-१) |
| ४ | लेखापाल | १ | (पुणे-१) |
| ५ | वनसर्व्हेक्षक | ५ | (पुणे-१/ठाणे-३/औरंगाबाद-१) |
| ६ | वनक्षेत्रसर्व्हेक्षक | १ | (पुणे-१) |
| ७ | चेनमन | २ | (ठाणे-२) |
| ८ | चपराशी/ शिपाई | २ | (पुणे-१ / प.मुंबई (वन्यजीव)-१) |
| ९ | जीपचालक | २ | (पुणे-१) / (नागपूर-१) |
| १० | पहारेकरी | १ | (नागपूर-१) |
| एकूण | | **२० पदे** | |

***